**श्री.सुमंत संभाजी पाटील, सहाय्यक कार्यकारी अभियंता (स्थापत्य), सिडको यांची उप अभियंता, नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:-नांमपा-२०२३/प्र.क्र.३४४ /नवि-२४**

४ था मजला (मुख्य इमारत), मंत्रालय मादाम कामा मार्ग,
राजगुरू हुतात्मा चौक, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- १४ ऑगस्ट,२०२३.

**संदर्भ:-** आयुक्त, नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका यांचे पत्र,
जा.क्र.नांवाशमनपा/साप्रवि/आस्था-१/३३६३/२०२३, दि.२०.७.२०२३.

**प्रस्तावना:-**

नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेकरीता एकूण १९०३ पदांचा आकृतीबंध शासन निर्णय दि.१४.२.२०२३ अन्वये मंजूर करण्यात आलेला आहे. नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेत अमृत-२ योजना मंजूर झाली असून त्याची अंमलबजावणी करणेसाठी तांत्रिक अभियंत्याची गरज भासत आहे. नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेच्या आस्थापनेवर तांत्रिक पदावर पदोन्नती देण्यासाठी अधिकारी सध्या पात्र नाहीत.

२. श्री. सुमंत संभाजी पाटील सध्या सिडको मध्ये सहाय्यक कार्यकारी अभियंता या पदावर कार्यरत आहेत. श्री. पाटील यांनी नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेत प्रतिनियुक्तीने काम करणेबाबत संधी देणे बाबत विनंती शासनास केली आहे.

३. नांदेड वाघाळा शहर महानगरपालिकेचे उप अभियंता संवर्गातील अधिकारी पदोन्नतीस पात्र होईपर्यंत श्री.पाटील, सहाय्यक कार्यकारी अभियंता, सिडको यांना समकक्ष पदावर उप अभियंता, एस-२०, स्तर-२ या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती देण्याबाबत आयुक्त, नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका यांनी संदर्भाधीन पत्रान्वये शिफारस केली आहे.

४. श्री.पाटील सहाय्यक कार्यकारी अभियंता (स्थापत्य), सिडको यांची विनंती व आयुक्त, नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका यांच्याकडून प्राप्त शिफारशीनुसार श्री. पाटील यांची उप अभियंता, नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका या रिक्त पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

श्री.सुमंत संभाजी पाटील, सहाय्यक कार्यकारी अभियंता (स्थापत्य), सिडको यांची नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेत रिक्त असलेल्या उप अभियंता या पदावर प्रथमत: एक वर्षाच्या कालावधीसाठी प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

२. श्री.पाटील यांची महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयत्तोर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या परिशिष्ट-२ मध्ये विहीत करण्यात आल्यानुसार प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार स्विकारल्यापासून एक वर्षाच्या कालावधीसाठी खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात येत आहे:-

(अ) नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिकेतील उप अभियंता ह्या रिक्त पदावर श्री. पाटील यांची प्रतिनियुक्ती जो पर्यंत सदर पदावर पदोन्नतीने पात्र अधिकारी उपलब्ध होत नाही, तो पर्यंत असेल.

(ब) जर, त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टिने शासनास आवश्यक वाटली, तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/ सक्षम प्राधिकारी यांना असेल.

(क) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही, तर त्यांना मूळ विभागाकडे पाठविण्याची मुभा स्वीयेतर नियोक्त्याला राहील, मात्र, त्याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेतर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिन्याची नोटीस देणे आवश्यक राहील.

(ड) प्रतिनियुक्ती कालावधी संपण्याआधी त्यांना मूळ विभागाकडे परत जावयाचे असल्यास कमीत कमी ३ महिन्यांची लेखी नोटीस शासनास देणे आवश्यक राहील. त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याबाबत शासन मान्यतेनंतर मुभा राहिल.

(ई) श्री.पाटील यांना प्रतिनियुक्तीच्या काळातील प्रदाने नियमानुसार लागू राहतील.

३. व्यवस्थापक (कार्मिक), शहर व औद्योगिक विकास महामंडळ (महाराष्ट्र) मर्यादित, नवी मुंबई यांनी श्री.पाटील यांना तात्काळ कार्यमुक्त करावे. कार्यमुक्त केल्यानंतर श्री.पाटील यांनी प्रतिनियुक्तीच्या पदी तात्काळ रुजू व्हावे. आयुक्त, नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका यांनी याप्रमाणे अहवाल शासनास सादर करावा.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेतांक २०२३०८१४१०५५०२११२५ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VIDYA RAMAPPA HAMPAYYA

Digitally signed by VIDYA RAMAPPA HAMPAYYA
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=URBAN DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=7b40f543d9d95d4cad6707bb7eae1089289d9878b7cb34418f111566e3223ba1, postalCode=400032,
st=Maharashtra,
serialNumber=A94EF1B631F4673B829AC9ADBEB5B0DDABD086A7544E3FDF47CD7A011FF7EA40, cn=VIDYA RAMAPPA HAMPAYYA
Date: 2023.08.14 10:56:41 +05'30'

**( विद्या हम्पय्या )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत तातडीच्या आवश्यक कार्यवाहीसाठी,**

१. आयुक्त, नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड.
२. व्यवस्थापक(कार्मिक), शहर व औद्योगिक विकास महामंडळ (महाराष्ट्र) मर्यादित, नवी मुंबई

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२) मा.उपमुख्यमंत्री महोदयांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) व्यवस्थापकीय संचालक, शहर व औद्योगिक विकास महामंडळ (महाराष्ट्र) मर्यादित, नवी मुंबई
४) जिल्हाधिकारी, नांदेड.
५) आयुक्त,  नांदेड-वाघाळा शहर महानगरपालिका, नांदेड.
६) प्रधान सचिव (नवि-२) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई.
७) निवड नस्ती, नवि-२४.